**श्री. जयद्रथ महादेव गायकवाड यांना मा.न्यायालयाच्या आदेशानुसार न्या.कालेलकर करारानुसार पूर्वलक्षी प्रभावाने रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः काव्यआ-२०१३/प्र.क्र.५६६/आस्था.१०,
बांधकाम भवन,२५ मर्झबान पथ,
फोर्ट,मुंबई-४०० ०३२,
तारीख: २९ मे,२०१५.

वाचा -

१) शासन निर्णय,सार्वजनिक बांधकाम विभाग,क्र.रुअआ-१५९६/२२८/सेवा-५, दि.२४ एप्रिल,२००१
२) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचे पत्र क्र.२०१४/ विशा /जिप /आस्था.१/सीआर-११/कावि- १६२८,दि. ३/११/२०१४

प्रस्तावना :-

श्री.जयद्रथ महादेव गायकवाड हे सन १९८३ पासून “स्वच्छक” या पदावर कार्यरत होते. दि.२४/९/१९८७ रोजी “वाहन चालक” म्हणून त्यांना नेमणूक दिली. मात्र त्याच दिवशी त्यांची सेवा लेखी आदेशान्वये संपुष्टात आणली. या आदेशास त्यांनी सोलापूर कामगार न्यायालयात आव्हानीत केले असता, मा.कामगार न्यायालयाने त्यांच्या दि.११/११/१९९८ च्या आदेशान्वये त्यांना पुन्हा सेवेत घेण्याचे आदेश देऊन श्री. गायकवाड यांना मागील सर्व थकबाकी देण्याचे आदेश दिलेले आहेत. या आदेशाची अंमलबजावणी १५ दिवसांत करण्याचे आदेशात स्पष्ट केले. मात्र सदर आदेशाचे पालन होत नसल्याने श्री.गायकवाड यांनी पुन्हा मा.कामगार न्यायालयात अवमान याचिका दाखल केली. सदर अवमान याचिकेची दखल घेऊन जिल्हा परिषद, उस्मानाबाद यांनी श्री.गायकवाड यांच्याशी दि.२५/८/१९९९ रोजी तडजोडनामा केला. ज्यामध्ये श्री. गायकवाड यांना दि.२४/९/१९८७ पासून सेवेची सलगता देऊन पुनर्स्थापित केल्याशिवाय श्री.गायकवाड हे मागील कोणतीही थकबाकी मागणार नाहीत हेही त्यांनी मान्य केलेले आहे. सदरच्या तडजोडनाम्यावर मा.कामगार न्यायालयाने दि.२५/८/१९९९ रोजी Compromise Pursis is allowed असे आदेश दिले त्यानुसार जिल्हा परिषद उस्मानाबाद यांनी दि.३१/८/१९९९ च्या आदेशान्वये श्री.गायकवाड यांना दि.२४/९/१९८७ पासूनची सेवेची सलगता देऊन कार्यव्ययी आस्थापनेवर तात्पुरत्या स्वरुपात पुनर्स्थापित केले आहे.

२. तद्नंतर जिल्हा परिषद, उस्मानाबाद यांनी श्री.गायकवाड यांचा दि.४/१/२००८ च्या पत्रान्वये रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेण्याचा प्रस्ताव शासनाकडे पाठविण्यात आला. मात्र, सदर प्रस्ताव तपासणी सूचीनुसार नसल्याने त्यानुसार तपशीलवार प्रस्ताव पाठविण्याचे जिल्हा

परिषद, उस्मानाबाद यांना कळविण्यात आले. याबाबत श्री.गायकवाड, यांनी दरम्यान कालावधीत शासनाकडे विनंत्या अर्ज दि.१/६/२०१० व दि.८/१०/२०१३ अर्जावर शासन स्तरावर कोणतेही कार्यवाही होत नसल्याने मा. उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथे रिट याचिका क्र.९४४८/२०१३ दाखल केली. या याचिकेवर मा.उच्च न्यायालयाने दि.२६/११/२०१३ रोजी श्री.गायकवाड यांच्या दि.१/६/२०१० ते ८/११/२०१३ च्या निवेदनावर तीन महिन्यांच्या आत निर्णय घेण्याचे आदेश दिले.

३. श्री.गायकवाड यांचा रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेण्याचा प्रस्ताव विभागीय आयुक्त,औरंगाबाद यांचेकडून आवश्यक त्या कागदपत्रांसह सविस्तर प्रस्ताव प्राप्त झाला नाव्हता. त्यामुळे शासनास वेळीच निर्णय घेता आला नाही. त्यामुळे व्यथित होऊन श्री. गायकवाड यांनी मा. उच्च न्यायालय,खंडपीठ औरंगाबाद येथे अवमान याचिका क्र.३७३/२०१४ दाखल केलेली आहे. या याचिकेच्या अनुषंगाने शासनास दि.३०/४/२०१५ पर्यंत निर्णय घेण्याचे सरकारी वकील, मा.उच्च न्यायालय,खंडपीठ औरंगाबाद यांचे दि.८/४/२०१५ च्या पत्रान्वये शासनास कळविण्यात आले आहे.

४. उपरोक्त वस्तुस्थिती पाहता या प्रकरणात खालील बाबी निदर्शनास येतातः-

अ) शासनाने यापूर्वी श्री. गायकवाड यांचा सीआरटीचा प्रस्ताव ते पात्र ठरत नाहीत या कारणाने अमान्य केल्याचे विभागीय आयुक्तांना कळविले आहे. मात्र त्या पत्रात त्याची कारणमिमांसा नाही वा त्याबाबतचे टिप्पणी लेखनही कागदपत्रात उपलब्ध नाही.

ब) नव्याने प्राप्त झालेला प्रस्ताव व कागदपत्रे यांची छाननी केली असता श्री.गायकवाड हे १९८३ पासून दि.२४/९/१९८७ पर्यंत जिल्हा परिषदेच्या सेवेते होते. तद्नंतर कामगार न्यायालय, सोलापूर यांनी दिलेले आदेश व त्याच न्यायालयात दाखल झालेली अवमान याचिका व त्यानुषंगाने सादर केलेला दि.२५/८/१९९९ चा तडजोडनामा पाहता या तडजोडनाम्यानुसार श्री.गायकवाड यांना दि.२४/९/१९८७ पासूनचे सेवासातत्य दिलेले आहे. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दि.२४/४/२००१ च्या शासन निर्णयानुसार जिल्हा परिषदेत तात्पुरत्या स्वरुपात कार्यरत असलेले कर्मचारी रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेण्याकरिता ज्या अटी व शर्ती निश्चित केलेल्या आहेत त्या अटीमधील एक अट ज्यामध्ये संबंधित कर्मचाऱ्यांचे दि.३१/१२/१९९८ रोजी सलग पाच वर्षाची सेवा होणे ही प्रमुख अट आहे. कामगार न्यायालयाच्या निर्णयानुसार व तडजोडनाम्यानुसार ती अट ते पूर्ण करीत आहेत.

क) सन-१९८३ ते सन-१९८७ पर्यन्तची श्री.गायकवाड यांची जिल्हा परिषदेमध्ये झालेली सेवा तसेच तडतोडनाम्यानुसार श्री.गायकवाड यांना १९९९ पर्यंत दिलेले सेवासातत्य विचारात घेता वरील शासन निर्णयाच्या नमूद अटीनुसार गायकवाड यांची सलग पाच वर्षाची सेवा झालेली आहे असे अनुमान काढण्यास कोणताही प्रत्यवाय नाही. श्री.गायकवाड हे जिल्हा परिषद सेवेत कार्यरत आहेत.

ड) जरी यापूर्वी शासनाने दि.२५/१/२०१० च्या पत्रान्वये श्री.गायकवाड हे सी.आर.टी. वर घेण्यास पात्र नसल्याचे कळविले असले तरी वर नमूद केलेली कारणमिमांसा पाहता श्री. गायकवाड हे सीआरटीवर घेण्यास पात्र आहेत अशी या विभागाची धारणा आहे.

इ) मा. उच्च न्यायालयाचे आदेश हे श्री.गायकवाड यांना त्यांच्या दि.१/६/२०१० व दि.८/१०/२०१३ च्या पत्रावर निर्णय घेऊन उत्तर देण्यापुरते मर्यादित असले तरी उपरोक्त सर्व वस्तुस्थिती विचारात घेता शासन स्तरावरुन दि.२५/१/२०१० च्या पत्रान्वये घेतलेला निर्णय शहानिशा न करता घेतलेला दिसतो. त्यामुळे या प्रकरणी मा.उच्च न्यायालयाच्या आदेशातील नमूद अर्जदाराच्या दि.१/६/२०१० व दि.८/१०/२०१३ च्या अनुषंगाने शासन पत्र दि.२५/१/२०१० संदर्भात कोणतीही कारणमिमांसा स्पष्ट करता येणार नाही. कारण प्रस्तुत प्रकरणी तडजोडनाम्यानुसार श्री.गायकवाड यांना १९८७ पासून सेवासातत्य दिलेले असल्याने व आज रोजी ते १९९९ पासून सेवेत असल्याने त्यांची सी.आर.टी. संदर्भात शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग दि.२४/४/२००१ मधील अटीनुसार दि.३१/१२/१९९८ पूर्वीची ५ वर्षाची सलग सेवा गृहीत धरणे अपरिहार्य आहे व त्यामुळे शासन पत्र दि.२५/१/२०१० अन्वये घेतला निर्णय गैर लागू होतो. ही वस्तुस्थिती विचारात घेता श्री.गायकवाड यांना सी.आर.टी. चे फायदे देणे आवश्यक असून (तडजोडनाम्यानुसार ते १९८७ ते १९९९ पर्यंतचे back wages मागणार नाहीत.) त्यांना सी.आर.टी. वर घेण्यास सामान्य प्रशासन विभाग तसेच वित्त विभाग यांची मान्यता देण्याबाबत विनंती करण्यांत आली होती. त्याप्रमाणे सा.प्र.विभागाने या विभागाच्या प्रस्तावास मान्यता दिली आहे. तसेच वित्त विभाग यांनी, जर ग्राम विकास विभाग यांनी यापूर्वी केलेली कार्यवाही मान्य करणे एकच पर्याय आहे तर अभिप्राय देण्यास वाव उत्तर नाही असे अभिप्राय दिलेले आहेत.

**<u>शासन निर्णय :-</u>**

रोजंदारी /कार्यव्ययी आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांना रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.रुअआ-१५९६/२२८/सेवा-५, दि.२४ /४/२००१ मधील तरतूदी विचारात घेऊन सोबत जोडलेल्या परिशिष्ट-"अ" मध्ये नमूद केल्याप्रमाणे विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचे प्रस्तावातील श्री. जयद्रथ महादेव गायकवाड,"वाहन चालक" रोजंदारी कर्मचाऱ्यास रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. शासनाने घेतलेल्या निर्णयानुसार या निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट-"अ" मधील रोजंदारी कार्यव्ययी आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या रकाना क्र.६ मधील पदावर व रकाना क्र.७ मध्ये दर्शविलेल्या दिनांकापासून रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्यास शासन मान्यता देत आहे:-

२. शासनाच्या या निर्णयानुसार कर्मचाऱ्यांना रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर आणल्यानंतर त्यांना न्या.कालेलकर कराराच्या तरतूदीनुसार अनुज्ञेय ठरणाऱ्या वेतनवाढीतील फरकाचे विनियमन व मा.कामगार न्यायालयातील तडजोड नाम्यानुसार संबंधीत कर्मचाऱ्यास दि.२५/८/१९९९ पूर्वीचे कोणतेही आर्थिक लाभ देय होणार नाहीत.

३. वर नमूद केलेल्या थकबाकीच्या रकमेवर कोणत्याही प्रकारचे व्याज अनुज्ञेय असणार नाही आणि संबंधित कर्मचाऱ्यांकडून अथवा दिवंगत कर्मचाऱ्यांच्या वारसाकडून भविष्यात व्याजाबाबतची

मागणी करण्यांत येणार नाही अशाप्रकराचे प्रतिज्ञापत्र त्यांनी जिल्हा परिषदेला सादर करणे बंधनकारक राहील

४. संबंधित जिल्हा परिषदांनी या शासन निर्णयान्वये कर्मचाऱ्यांना चालू आर्थिक वर्षात अदा करावा लागणारा खर्च मंजूर अनुदानातून करावयाचा आहे.

५. रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेचे आदेश निर्गमित झाल्यानंतर, सदर आदेश कर्मचाऱ्यांस मान्य नसल्यास त्यांनी त्याबद्दलचे लेखी प्रतिवेदन त्याला व्यक्तीनिहाय आदेश मिळाल्यापासून तीन महिन्यात सादर करणे आवश्यक आहे. या मुदतीत कोणतेही प्रतिवेदन प्राप्त न झाल्यास त्याचे काढलेले व्यक्तीनिहाय आदेश अंतिम समजण्यात येतील व त्यानंतर त्याची कोणतीही तक्रार विचारात घेतली जाणार नाही.

६. अस्थायी आस्थापनेवर रुपांतरित झालेले पद संबंधित पदधारक ज्या दिनांकापर्यंत सेवेत असतील त्या दिनांकापर्यंत चालू ठेवण्यात येत आहे.

७. हे आदेश शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग,क्र.रुअआ-१५९६/२२८/सेवा-५, दि.२४ एप्रिल, २००१ अन्वये दिलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१८१९२८५०७९२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Govind Mahadev Mainkar

Digitally signed by Govind Mahadev Mainkar
DN: CN = Govind Mahadev Mainkar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Section Officer
Reason: I am approving this document
Date: 2015.06.04 15:09:30 +05'30'

गोविंद माईणकर
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
२. मा.राज्यमंत्री, (ग्रा.वि.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
३. प्रधान सचिव, वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
४. सचिव,सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
५. विभागीय आयुक्त,विभागीय आयुक्त कार्यालय,औरंगाबाद विभाग,
६. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद,नागपूर,
७. महालेखापाल,महाराष्ट्र-१ मुंबई/ महाराष्ट्र-२,नागपूर,
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद उस्मानाबाद,

९. वित्त विभाग (व्यय-१५) मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
१०.ग्राम विकास व जलसंधारण विभागातील सर्व सह सचिव/उप सचिव,
११.कक्ष अधिकारी ,आस्था.७,८,९,१२ व १४ ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई४०० ०३२,
१२.निवड नस्ती, कार्यासन आस्था.१०,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

परिशिष्ट-"अ"

शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.काव्यआ-२०१३/प्र.क्र.५६६/ आस्था.१०
दिनांक-२९ मे,२०१५ चे सहपत्र.

| अ.क्र. | कर्मचाऱ्याचे नांव | आस्थापनेचा प्रकार रोजंदारी/ कार्यव्ययी | नेमणूकीचे पद | विभागाचे नांव | रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाच्या पदाचे नांव | ज्या दिनांकापासून रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाचे आहे तो दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्री.जयद्रथ महादेव गायकवाड | कार्यव्ययी | चालक | बांधकाम विभाग जिल्हा परिषद उस्मानाबाद | वाहन चालक | २४/०९/१९८७ |